मौजे टाकळी माळी (ता. जि. औरंगाबाद ) या
नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत
अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांकः पापुयो - २०१७/प्र.क्र. ८७ /पापु १८
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मुंबई-४०० ०३२
तारीखः २० जुन, २०१७

वाचा -

१) शासन निर्णय क्र.पापुयो-२०१४/प्र.क्र.५१/पापु-१८, दिनांक २३/०५/२०१४.
२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, औरंगाबाद यांचे आदेश क्र.मजीप्रानावग्रायोमंऔ/भविक/तांशा-१/२०१४/४७३, दिनांक ९ जुलै,२०१४.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे पत्र क्र.जिपऔ/पापु/तांशा/२०१७/८०१, दिनांक २५/०५/२०१७.
४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे तांत्रिक मान्यता आदेश क्र.७७९, दिनांक १२/०६/२०१७
५) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाबाबतचा शासन निर्णय ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७,दिनांक १५.०६.२०१५ च दि.१४ मार्च,२०१६.

प्रस्तावना

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे टाकळी माळी (ता. जि. औरंगाबाद ) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. १,०४,०७,०००/- (ढोबळ) किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र १ येथील आदेशान्वये मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सदर योजनेच्या कामांना मुळ तांत्रिक मान्यता दिली होती.उद्भवविहीरीची खोली वाढल्याने तसेच विहीरीवर जाण्यासाठी जोडबंधाऱ्याचा नव्याने समावेश करावा लागला तसेच अन्य अनुषंगीक कामात वाढ झाल्यामुळे योजनेच्या किंमतीत वाढ झाली असल्याने मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.३ अन्वये प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. दरम्यान कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये प्रस्तुत योजनेच्या रु.१,१८,३१,८००/-(ढोबळ) किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत तांत्रिक मान्यता दिली. यास्तव त्यास अनुसरुन प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

मौजे टाकळी माळी (ता.जि. औरंगाबाद) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रुपये.१,१८,३१,८००/- (ढोबळ) (अक्षरी रुपये एक कोटी अठरा लक्ष एकतीस हजार आठशे )** एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करुन पाणी पुरवठा सुरु करण्याच्या अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे. त्या करिता संबधित पर्यवेक्षीय उप अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांनी प्रत्येक महिन्याला कामाचा आढावा घेवून अहवाल कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांना सादर करावा. उपरोक्त मुदतीत समितीने योजनेची कामे पूर्ण न केल्यास जिल्हा परिषदेमार्फत पूर्ण करावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, औरंगाबाद यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी व कंत्राटदार यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु.१४,२५,११६/- (अक्षरी रुपये चौदा लक्ष पंचवीस हजार एकशे सोळा फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२०१५०७०५५४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh D. Ambekar

Digitally signed by Suresh D. Ambekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=296e3c880fd1b089cf7bc9aed875e1bd95a2e8ed913596c74f7aa9e24917bc3c, cn=Suresh D. Ambekar
Date: 2017.06.20 15:03:49 +05'30'

**( सु.दे.आंबेकर )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
४) जिल्हाधिकारी, औरंगाबाद.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
६) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
९) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद.
१०) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
११) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद
१३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७,१९ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१६) निवडनस्ती कार्यासन पापु-१८.